**कोषागारातून रोखीने देय**
**आदेश क्रमांक-१**

सन २००८-२००९ मधील केंद्र शासनाने वितरीत केलेल्या (दुसरा हप्ता) निधीस अनुरुप राज्य हिस्सा (एस.सी.पी.) शिल्लक राहिलेला निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन,**
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक इंआयो २००९/प्र.क्र.९८/ योजना-१०
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२, दि. १८ ऑगस्ट, २००९.

वाचा: १ केंद्र शासनाचे इंग्रजी ज्ञापन क्र. J-11060/1/2007/RH,(P)-Dated-31st March, 2008.
२ शासन निर्णय क्रमांक इंआयो २००९/प्र.क्र.८५/ योजना-१०, दि. २६ मार्च, २००९
३ शासन निर्णय क्रमांक इंआयो २००९/प्र.क्र.८६/ योजना-१०, दि. ३० मार्च, २००९

**प्रस्तावना :-**

१. केंद्र शासनाने संदर्भ क्र.१ येथील दि.३१.३.२००८ च्या ज्ञापनान्वये वर्ष २००८-०९ पासून घरकुलाच्या अनुदानात वाढ करुन ती रु.३५०००/- (रु.पस्तीस हजार) अशी केली असुन त्या अनुषंगाने राज्यशासनाने उपरोक्त क्र. ६ येथील शासन निर्णय दि.२६.९.०८ च्याअन्वये राज्य हिस्सा (२५%) अधिक राज्याचा अतिरिक्त हिस्सा म्हणून रु.८५००/-असे अनुदान निश्चित केले आहे.

२. केंद्र शासनाने सन २००८-०९ करिता पहिल्या हप्त्यामध्ये वितरित केलेल्या अनुदानाच्या अनुषंगाने राज्याचा समरुप हिस्सा वितरित केला आहे. तदनुसार वर्ष २००८-०९ मधील दि.१.४.२००८ पासून मंजुर केलेल्या नवीन घरकुलासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त निधीस अनुरुप राज्य शासनाचा राज्यहिस्सा (२५%) रुपये ५०,६९,२९०००/- (रु.पन्नास कोटी एकोनसत्तर लक्ष एकोणतीस हजार )+ राज्य शासनाचा अनुज्ञेय अतिरिक्त हिस्सा प्रति घरकुल रुपये ८५००/- पैकी पहिला भाग म्हणून रु.५०००/- या प्रमाणे वर्ष २००८-०९ च्या एकूण उदिष्टाच्या प्रमाणात म्हणजेच एकूण उदिष्ट x रु.५००० या प्रमाणे १ला हप्ता म्हणून राज्यातील एकूण उदिष्टासाठी रु.५७,९३,४५०००/-(रु.सत्तावन्न कोटी,त्र्यान्नव लक्ष पंचेचाळीस हजार) असा एकूण रुपये १०८,६२,७४०००/-(रु.एकशे आठ कोटी बासष्ट लक्ष चौ-याहत्तर हजार)राज्यहिश्श्यापोटी वितरित करण्यात आलेला आहे.

३. केंद्र शासनाच्या सन २००८-२००९ या वित्तीय वर्षामध्ये केंद्रिय अनुदानापोटी इंदिरा आवास योजनेअंतर्गत दुसऱ्या हप्त्यापोटी रुपये ८४,२९,२२,०००/-(रु. चौऱ्याऐंशी कोटी एकोणतीस लक्ष बावीस हजार फक्त) निधी राज्यातील २० जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणांना वितरीत केलेला आहे.

४. राज्य शासनाच्या ग्राम विकास व जलसंधारण विभागाने विशेष घटक योजनेंतर्गत इंदिरा आवास योजनेकरीता २००८-२००९ या चालू वित्तीय वर्षासाठी केलेल्या जिल्हानिहाय व लेखाशीर्षनिहाय उपलब्ध तरतूदींच्या अधीन राहून राज्य हिश्श्यापोटी ( दुसरा हप्ता) देय असणारा उपरोक्त **रुपये १५,५८,७४,०००/-(रु.पंधरा कोटी अठ्ठावन्न लाख चौऱ्याहत्तर हजार फक्त)** निधी संबधित सतरा

जिल्हयांना ( पुणे, औरंगाबाद, सातारा हे जिल्हे वगळून) वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २००८-२००९ या वित्तीय वर्षासाठी केंद्रपुरस्कृत इंदिरा आवास योजनेसाठी सोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" नुसार ग्राम विकास व जलसंधारण विभागाने विशेष घटक योजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून **रुपये १५,५८,७४,०००/-(रु.पंधरा कोटी अठ्ठावन्न लाख चौऱ्याहत्तर हजार फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. विवरणपत्र "अ" मध्ये लेखाशिर्षातंर्गत जिल्हानिहाय खाली दर्शविल्याप्रमाणे रकमा संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याकडे शासन सुपूर्द करीत असून, त्या संबंधित जिल्हयाच्या कोषागारातून तात्काळ रोखीने काढण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर खर्च खाली दर्शविलेल्या अर्थसंकल्पीय लेखाशीर्षाखालील सन २००९-२०१० च्या उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**( रुपये लाखांत )**

| **विवरणपत्र** | **अर्थसंकल्पिय लेखाशीर्ष व संकेतांक क्रमांक** | **वितरीत करण्यात आलेली एकूण रक्कम** | |
|---|---|---|---|
| | | **अंकी** | **अक्षरात** |
| | | | |
| **जोडपत्र "अ" (एस.सी.पी.)** | **मागणी क्रमांक एल-०३ २५०५ ग्रामीण सेवा योजन ६० इतर कार्यक्रम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (एक)-इंदिरा आवास योजना (दोन) विशेष घटक योजना इंदिरा आवास योजना इंदिरा आवास योजनेअंतर्गत खर्च भागविण्यासाठी जिल्हा ग्रामीण विकास अभिकरण/जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५०५०५७-७)** | **१५५८.७४** | **रु. पंधरा कोटी अठ्ठावन्न लाख चौऱ्याहत्तर हजार फक्त** |

३. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी सदरहू निधी मिळाल्यानंतर हा निधी संबंधित यंत्रणांना / पंचायत समित्यांना एक दिवसांच्या आत वितरीत करावा. यंत्रणांना/अधिका-यांना वितरीत केलेल्या निधीच्या आदेशाची एक प्रत न चुकता या विभागास पृष्ठांकित करावी. वितरीत निधी योजनाबध्द नियोजन करुन खर्च करावा. तसेच आपल्या यंत्रणेस एकूण प्राप्त हप्ता व अखर्चित निधी मिळून जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे एकूण उपलब्ध निधीमधून माहे मार्च, २०१० अखेर पर्यंत १०० टक्के खर्च होईल, याची खबरदारी घ्यावी.

४. येथे असेही नमूद करण्यात येते की सन २००८-०९ पासून जिल्हा वार्षिक योजना ( सामान्य ) या बाबत मागणी क्र.एल ०३, २५०५ ग्रामीण सेवा योजना ६० इतर कार्यक्रम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (एक) इंदिरा आवास योजना इंदिरा आवास योजनेअंतर्गत खर्च भागविण्यासाठी जिल्हा ग्रामीण विकास /

जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५०५०५६८)या लेखाशिर्षाखालील निधी जिल्हाधिकारी यांचेकडून संबधीत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना वितरीत केला जाणार आहे.

५. हा शासन निर्णय (१) वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३७ /०९/अर्थ-१७,दिनांक १३.०७.२००९ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने आणि **योजनेच्या सन २००९-२०१० च्या अर्थसंकल्पिय तरतूदीचे मासिक विवरण पत्र (MonthlyCash Flow) यास अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे**.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८२०१७३२१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र.ह.श्रावणपाटील )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत:-**

१) राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मुख्यमंत्र्यांचे सचिव
३) वित्त विभाग, कार्यासन क्रमांक व्यय-१५ व अर्थसंकल्प ३ व १७
४) आदिवासी विकास विभाग, कार्यासन क्रमांक ७, १२,मंत्रालय, मुंबई-४०००३२
५) नियोजन विभाग,,मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा), मुंबई
९) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा) नागपूर
१०) सर्व विभागीय आयुक्त
११) सर्व जिल्हाधिकारी.
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा ( संबधित ३३ जिल्हे )
१३) प्रकल्प संचालक , जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा ( संबधित ३३ जिल्हे )
१४) जिल्हा कोषागार अधिकारी ( संबधित ३३ जिल्हे )
१५) अप्पर संचालक,एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष,पे ॲन्ड अकौंटस कॉम्प्लेक्स बॅरेकनं.१४ मुंबई -२१( ५ जादा प्रतीसह )
१६) कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक वित्त -१ ( ग्रामविकास )
१७) कक्ष अधिकारी , कार्यासन क्रमांक जल-१५ , जल-१६, जल-१९ व जल-२२ (जलसंधारण )
१८) सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय ,भारत सरकार ,नवी दिल्ली ( पोष्टाने )
१९) निवडनस्ती ( कार्यासन क्रमांक योजना-१० ).

| विवरणपत्र अ | | | |
|---|---|---|---|
| इंआयो -२००९/ प्र. क्र.९८ / योजना-१०, दि. १८ ऑगस्ट ,२००९ ग्राम विकास व जलसंधारण विभाग ,मंत्रालय, मुंबई -३२<br>वितरण आदेश क्र. १ | | | |
| ( रुपये लाखात) | | | |
| विशेष घटक योजना (एस्.सी.पी) | | | |
| अ.क्र. | जिल्हा | रुपये (अंकात) | रुपये ( अक्षरात) |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | ७८.४३ | रुपये अठयाहत्तर लक्ष त्रेचाळीस हजार फक्त |
| २ | रायगड | २२.७९ | रुपये बावीस लक्ष एकोणऐंशी हजार फक्त |
| ३ | रत्नागिरी | ७६.६१ | रुपये शहात्तर लक्ष एकसष्ठ हजार फक्त |
| ४ | सिंधुदुर्ग | ६.८१ | रुपये सहा लक्ष एक्याऐंशी हजार फक्त |
| ५ | धुळे | ३४.०४ | रुपये चौतीस लक्ष चार हजार फक्त |
| ६ | जळगांव | ९४.८० | रुपये चौऱ्यांण्णव लक्ष ऐंशी हजार फक्त |
| ७ | सोलापूर | ४८६.५३ | रुपये चार कोटी शहाऐंशी लक्ष त्रेपन्न हजार फक्त |
| ८ | कोल्हापूर | ११७.६५ | रुपये एक कोटी सतरा लक्ष पासष्ट हजार फक्त |
| ९ | जालना | ८५.८५ | रुपये पंचयाऐंशी लक्ष पंचयाऐंशी हजार फक्त |
| १० | हिंगोली | ३७.०६ | रुपये सदतीस लक्ष सहा हजार फक्त |
| ११ | बीड | १११.६० | रुपये एक कोटी अकरा लक्ष साठ हजार फक्त |
| १२ | उस्मानाबाद | ९७.४६ | रुपये सत्याण्णव लक्ष सेहेचाळीस हजार फक्त |
| १३ | लातुर | ८४.५३ | रुपये चौऱ्याऐंशी लक्ष त्रेपन्न हजार फक्त |
| १४ | बुलढाणा | ४८.४६ | रुपये अठ्ठेचाळीस लक्ष सेहेचाळीस हजार फक्त |
| १५ | वर्धा | ३८.८७ | रुपये अडतीस लक्ष सत्याऐंशी हजार फक्त |
| १६ | चंद्रपुर | ४८.६५ | रुपये अठ्ठेचाळीस लक्ष पासष्ट हजार फक्त |
| १७ | गडचिरोली | ८८.६० | रुपये अठयाऐंशी लक्ष साठ हजार फक्त |
| | एकुण | १५५८.७४ | रुपये पंधरा कोटी अठ्ठावन्न लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त |

(र.ह. श्रावणपाटील)

कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन